**वित्तीय वर्ष २०२१-२२ करीता औद्योगिक पायाभूत सुविधांची निर्मिती व विकास (४८७५ ००२५) या योजनेअंतर्गत निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. औपासू- २०२२/ प्र.क्र.४६/ उद्योग-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २९ मार्च, २०२२

<u>वाचा</u> :- १) शासन निर्णय क्र. आयआयआय पॉलिसी २०१०/ प्र.क्र.७६८/ उद्योग-२, दि.२२/०२/२०१३.
२) शासन निर्णय क्र.औपासू २०१२/ प्र.क्र.२३४/ उद्योग-२, दिनांक २५/०२/२०१४.
३) शासन शुध्दीपत्रक क्र.औपासू-२०१६/ प्र.क्र.२१९/ उद्योग-२, दि.२०/१२/२०१६.
४) सुकाणू समितीच्या दि.२४/०२/२०२२ रोजी संपन्न आठव्या बैठकीचे इतिवृत्त दि.२८/०२/२०२२.

**शासन निर्णय :-**

औद्योगिक पायाभूत सुविधांची निर्मिती व विकास योजना (४८७५ ००२५) या योजनेअंतर्गत उद्योग संचालनालयामार्फत प्राप्त प्रस्ताव, मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि.२४/०२/२०२२ रोजी संपन्न झालेल्या सुकाणू समितीच्या आठव्या बैठकीमध्ये विचारार्थ ठेवण्यात आले होते. सदर बैठकीमध्ये समितीसमोर सादर करण्यात आलेल्या प्रस्तावांपैकी ज्या प्रकल्पांना निधी वितरीत करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे, सदर प्रस्तावांची छाननी झाल्यानंतर उद्योग संचालनालयाने मंजूर प्रस्तावांच्या प्रशासकीय मंजूरीचे प्रस्ताव सत्वर शासनास सादर करावेत व तद्नंतर सुकाणू समितीने मान्यता दिलेल्या प्रकल्प मंजूरीच्या किंमतीनुसार उद्योग विभागाकडून प्रचलित कार्यपध्दतीनुसार प्रशासकीय मंजूरी आदेश/ कार्यान्वयन यंत्रणाकडून तांत्रिक मान्यता/ निधी वितरण आदेश विभागाकडून प्रस्तावित करण्यात येतील. तथापि, या दरम्यान आर्थिक वर्ष संपुष्टात येईल, ही बाब विचारात घेता सन २०२१-२२ या चालू आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पिय तरतूद वितरीत करुन महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडे सुपूर्द करावी व विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन कार्यान्वयन यंत्रणांना अदा करावी, असा निर्णय समितीने सर्वसहमतीने घेतला आहे. सदर बैठकीचे इतिवृत्त संदर्भ क्र.४ येथील दि.२८/०२/२०२२ च्या पत्रान्वये निर्गमित करण्यात आले आहे.

सन २०२१-२२ या आर्थिक वर्षामध्ये प्रस्तुत योजनेकरीता रुपये ३० कोटी एवढा निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. सुकाणू समितीच्या आठव्या बैठकीमध्ये समितीने एकूण १० संस्थांनी प्रस्तावित केलेल्या कामांकरीता शासन हिस्स्याची रुपये १६,०६,५८,५४७/- संस्थांना वितरीत करण्यास समितीने मान्यता दिली आहे. समितीने घेतलेल्या निर्णयानुसार सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात प्रस्तुत योजनेअंतर्गत अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीपैकी रुपये १६,०६,५८,५४७/- एवढा निधी वितरीत करण्यासाठी बीडीएस प्रणालीवर उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव नियोजन विभाग व वित्त विभागाच्या मान्यतेस्तव सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास नियोजन व वित्त विभागांनी मान्यता दिली आहे. सदर मान्यता विचारात घेवून, मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील सुकाणू समितीने दि.२४/०२/२०२२ रोजीच्या आठव्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार, औद्योगिक पायाभूत सुविधांची निर्मिती व विकास (४८७५ ००२५) या योजनेकरीता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पित झालेली रुपये १६,०६,५८,५४७ /- (अक्षरी सोळा कोटी सहा लक्ष अठ्ठावन्न हजार पाचशे सत्तेचाळीस फक्त) एवढी रक्कम विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांचे कार्यालयाकडे सुपूर्द करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय यांचे कार्यालयातील लेखाधिकारी यांनी सदर निधी आहरीत करुन महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ या कार्यान्वयन यंत्रणेकडे सुपूर्द करावा.

३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई यांना कळविण्यात येते की, सदर रकमेचा धनादेश “मुख्य अभियंता, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई” यांचे नावे काढून त्यांना अदा करण्यात यावा.

४. प्रस्तुत प्रयोजनार्थ होणारा खर्च हा मागणी क्र.के-१०, मुख्य लेखाशिर्ष - “४८७५, इतर उद्योगावरील भांडवली खर्च”, उपलेखाशिर्ष ६०-इतर, ८०० इतर खर्च, ८०० (००) (०१), औद्योगिक पायाभूत सुविधांची निर्मिती व विकास (कार्यक्रम) (४८७५ ००२५) या योजनेखाली सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात मंजूर अर्थसंकल्पित तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील सुकाणू समितीच्या दि.२४/०२/२०२२ रोजीच्या बैठकीत घेण्यात आलेला निर्णय, नियोजन विभाग व वित्त विभागाच्या मान्यतेनुसार तसेच वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. अनौस क्र.१०२/२०२२/व्यय-१६, दि.२३/०३/२०२२ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२२०३२९१३३११४५५१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Shamkant Degaonkar

Digitally signed by Sanjay Shamkant Degaonkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=INDUSTRY, ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=de0a2ca7914a3c02f24aa23655f609f41f2d36b0ec57da4c71f19aaf08230a79, serialNumber=56cf8c8577584adc42f070185c585c41084cc34f6683553d21ccacbfa33d4d1f, cn=Sanjay Shamkant Degaonkar
Date: 2022.04.01 15:10:36 +05'30'

**( संजय देगांवकर )**
सह सचिव (उद्योग), महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण) मुंबई.
२) महालेखापाल, महाराष्ट्र-२(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण), नागपूर.
३) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखा परीक्षण अधिकारी, मुंबई.
५) विकास आयुक्त(उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
७) मुख्य अभियंता, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
८) मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
९) वित्त विभाग (कार्यासन अर्थसंकल्प-१४ /व्यय-१६), मंत्रालय ,मुंबई.
१०) नियोजन विभाग (कार्यासन-१४६१), मंत्रालय ,मुंबई.
११) अवर सचिव (प्रशासन-१), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग ,मंत्रालय ,मुंबई.
१२) निवडनस्ती (उद्योग-२).